लेंडी प्रकल्पांतर्गत (महाराष्ट्र व तेलंगणा या राज्यांचा संयुक्त प्रकल्प) मौ.मुक्रमाबाद, ता.मुखेड, जि.नांदेड येथील बाधीत प्रकल्पग्रस्तांचे स्वेच्छा पुनर्वसन करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन,**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१८/१२८४/प्र.क्र.५८४/मोप्र-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक. २३ मार्च, २०२२.

**संदर्भ** :- १) जिल्हाधिकारी, नांदेड यांचे अशापक्र.२०१८उजिअ/स्वेच्छापु, दि.१७.७.२०१८

२) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे जा.क्र. गोमपाविम/तां.३/नांपामं/लेंडी प्रकल्प/पुन/१०४९, दि.२४.१.२०१९ चा प्रस्ताव.

३) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र..बैठक-२०२०/प्र.क्र.४०/र-१, दि.२७ जानेवारी, २०२२ अन्वये निर्गमित करण्यात आलेले महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन पुनर्स्थापना संनियंत्रण समितीच्या दि.१३.७.२०२१ च्या बैठकीचे सुधारित इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

लेंडी प्रधान प्रकल्प हा महाराष्ट्र व तेलंगणा राज्यामधील संयुक्त प्रकल्प असून सन १९८६ मध्ये सुरू करण्यात आला आहे. सद्य:स्थितीत धरणाचे काम ८०% पूर्ण झाले असून घळभरणीचे काम शिल्लक आहे. या प्रकल्पाच्या संयुक्त कालव्याची कामे जवळपास पूर्ण झाली असून महाराष्ट्राच्या हद्दीतील उर्वरीत कालव्याचे काम प्रगतीत आहे. सदर प्रकल्पाच्या धरणाचे काम सन २०११ पासून प्रकल्पग्रस्तांच्या पुनर्वसनविषयक मागण्यांच्या पूर्ततेअभावी बंद आहे. या प्रकल्पाच्या बुडीत क्षेत्रात १२ गावांचा समावेश होतो. त्यापैकी ११ गावांकरिता पुनर्वसनासाठी जमीन उपलब्ध होत असल्यामुळे त्यांच्या पुनर्वसनाची कार्यवाही करण्यात येत आहे. तथापि, मुक्रमाबाद या गावठाणाकरिता एकत्रितपणे जमीन एका ठिकाणी उपलब्ध होत नसल्यामुळे स्वेच्छा पुनर्वसनाच्या पर्यायाद्वारे प्रकल्पबाधितांच्या पुनर्वसनाचा प्रश्न मार्गी लावण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय :-**

लेंडी प्रकल्प हा आंतरराज्यीय प्रकल्प असल्याने त्यास महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम लागू नाहीत. तसेच महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम १९९९ मध्ये स्वेच्छा पुनर्वसनाबाबत कोणतीही तरतूद नाही. सदर प्रकल्प आंतरराज्य प्रकल्प असल्याने त्यातील प्रकल्पग्रस्तांस किमान महाराष्ट्र प्रकल्प बाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियमानुसार देय सुविधा उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. सद्य:स्थितीत राज्यात भूमीसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना करतांना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३ लागू करण्यात आला असून त्यातील नियम क्र.१०८ नुसार स्वेच्छा पुनर्वसनाबाबत तरतूद करण्यात आली आहे.

२. लेंडी प्रकल्पामुळे बाधित होणा-या मौजे मुक्रमाबाद,ता.मुखेड जि.नांदेड येथील प्रकल्पग्रस्त बाधित कुटुंबांचे स्वेच्छा पुनर्वसनास यान्वये मान्यता देण्यात येत असून, स्वेच्छा पुनर्वसनासाठी खालीलप्रमाणे एकमुस्त रक्कम अनुदान म्हणून देण्यात यावी.

- शेतकरी प्रति कुटुंब- रु.४.९९ लक्ष
- बिगर शेतकरी प्रति कुटुंब- रु.३.६९ लक्ष

याप्रमाणे एकूण रक्कम रु.७७४४.७८ लक्ष

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन व पुनर्स्थापना संनियंत्रण समितीच्या दि.१३.७.२०२१ रोजीच्या बैठकीतील निर्णयास तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१३१/ २०२०/ १४३३, दि.१४.९.२०२० व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६७/व्यय-१२, दि.२६.१०.२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासननिर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२४१५०७३०५०२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(अमोल फुंदे)
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) मा.विरोधीपक्षनेते,विधानसभा/विधानपरिषद,विधानमंडळ,महाराष्ट्रराज्य, मंत्रालय,मुंबई
५) मा.अध्यक्ष (मा.मंत्री मदत व पुनर्वसन) महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्रधिकरण,मुंबई
६) प्रधान सचिव,(आपत्ती व्यवस्थापन,मदत व पुनर्वसन) महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
८) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
९) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद
१०) मुख्य अभियंता ,जलसंपदा विभाग, औरंगाबाद.
११) आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) कार्यकारी संचालक,गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद
१३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद
१४) जिल्हाधिकारी,नांदेड
१५) मुख्य अभियंता, (जलसंपदा) जलसंपदा विभाग, औरंगाबाद
१६) अधिक्षक अभियंता, नांदेड पाटबंधारे मंडळ,नांदेड
१७) उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई-३२.
१८) अर्थ शाखा १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई-३२.
१९) निवड नस्ती- मोप्र-२ .